**“अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ” या योजनेकरीता मागणी क्रं. ओ-१० मुख्य लेखाशिर्ष “४२५०” अंतर्गत रु.३०.०० कोटी इतका निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**नियोजन विभाग**

**शासन निर्णय क्र. अपाम- २०२३/प्र.क्र.१००/का.१४२५**

मंत्रालय विस्तार कक्ष क्र.६५१,सहावा मजला ,
मादाम कामा रोड, राजगुरू हुतात्मा चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २७ एप्रिल, २०२३

वाचा : १) अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ मर्यादित मुंबई यांचे पत्र क्र. एपीएमएम/एडीएम/४४/२०२३-२४, दि.१३/०४/२०२३.

२) सामान्य प्रशासन विभाग यांची अधिसूचना क्र. शाकानि-२०२१/प्र.क्र.१५५/१८(रवका), दि.०९.०९.२०२१.

३) वित्त विभाग परिपत्रक क्र. अर्थस-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३ दिनांक १२ एप्रिल, २०२३.

**प्रस्तावना :**

अण्णासाहेब पाटील आर्थिक विकास मागास महामंडळ हे राज्यातील आर्थिकदृष्ट्या मागास घटकातील तरुण तरुणींना स्वयंरोजगाराच्या संधी उपलब्ध करुन देण्यासाठी आर्थिक लाभाच्या योजनांची अंमलबजावणी करीत आहे. महामंडळाच्या योजनांतर्गत आजपर्यत ५८,५०१ लाभार्थ्यांना रु. ४,०३८ कोटीचे व्यावसायिक कर्ज राज्यातील विविध बँकांनी मंजूर केलेले असून, त्यातील पात्र ४६,४१२ लाभार्थ्यांना महामंडळाने रु.३९२ कोटीचा व्याज परतावा वितरीत केला आहे व हे व्यज परतावा वितरणाचे कार्य महामंडळामार्फत निरंतर स्वरुपात सुरु आहे. त्याचप्रमाणे या महामंडळास प्रशासकीय खर्चाकरीता स्वतंत्र निधी प्राप्त होत नसून, महामंडळास भागभांडवल म्हणून प्राप्त झालेल्या निधीचे योग्य व्यवस्थापन करून, महामंडळ स्वत:चा प्रशासकीय व व्यवस्थापनाचा खर्च भागवते. महामंडळामार्फत कार्यान्वित योजनांतर्गत दरमहा जवळपास रु. २०.०० कोटीचा निधी व्याज परतावा स्वरुपात महामंडळ करीत आहे.

महामंडळामार्फत सद्यास्थितीत कार्यान्वित असलेल्या योजनांच्या सुयोग्य अंमलबजावणीकरिता व महामंडळामार्फत प्रस्तावित असलेल्या नवीन योजनांच्या अंमलबजावणीकरीता महामंडळाने सन आर्थिक वर्ष २०२३-२४ वर्षाकरिता महामंडळाच्या योजनांच्या अंमलबजावणीकरीता रु.३००.०० कोटीचा निधी शासनाने अर्थसंकल्पित केलेला आहे.

सद्यस्थितीत महामंडळाकडे मात्र रु. ५.०० कोटीचा निधी शिल्लक असून, सदरचा शिल्लक निधी महामंडळास पुढील ५ दिवसांकरिता पुरेसा आहे व महामंडळाकडे सद्यस्थितीत जवळपास २७००० लाभार्थ्यांचे व्याज परतावा करणे प्रगतीपथावर आहे.

वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थस २०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३ अन्वये अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चासाठी अर्थसंकल्पिय तरतुदीच्या पहिल्या तिमाही साठी २० टक्के इतका निधी बिम्स प्रणालीवर वित्त विभागाकडून वितरीत करण्यात येणार आहे. तथापि, नियोजन विभागाच्या बिम्स प्रणालीवर रु.३०.०० कोटी इतका निधी उपलब्ध असल्याचे दिसून येत आहे. त्यामुळे सदर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :**

नियोजन विभागाच्या अधिनस्त अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळास रु.३००.०० कोटी इतके अनुदान सन २०२३-२४ साठी अर्थसंकल्पित केले आहे. त्यातील रु.३०.०० कोटी इतके अनुदान बीम्स प्रणालीवर उपलब्ध असल्याने ते अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळास या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात येत आहे. सदरचा निधी अंतर्गत होणारा खर्च अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाने खालील लेखाशीर्षा मधून भागवावा.

मागणी क्र. ओ -१०

लेखाशिर्ष ४२५० इतर सामाजिक सेवा यावरिल भांडवली खर्च

(००) २- (००) १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका

(०१) (०१) अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ मर्यादित मुंबई

(०२) यास भांडवली अंशदान कार्यक्रम/दत्तमत

(०३) -संगणक सांकेतांक क्रमांक (४२५० ० अे ०७२) ३२, अंशदाने

प्रस्तुत अनुदान वितरित करण्यासाठी “नियंत्रक अधिकारी” म्हणून उपसचिव (रोखशाखा) व “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून कक्ष अधिकारी ( रोखशाखा ) यांची नियुक्ती करण्यात येत आहे.

अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाने नमूद उद्दिष्टाकरिता खर्च करण्याची दक्षता द्यावी.

प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक क्र. अर्थस -२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३ मधील तरतुदींच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४२७१५१९२७४११६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by VIDHYADHAR MAHADEV BORKAR
Date: 2023.04.27 15:26:42 +05'30'

**(वि.म. बोरकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), एक/दोन, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
२. महालेखापाल (लेखापरीक्षा), एक/दोन, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई
४. व्यवस्थापकीय संचालक, अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ मर्यादित मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी मुंबई.
६. सह सचिव (कार्यासन व्यय-८ व अर्थ-१६ ), वित्त विभाग , मंत्रालय, मुंबई.
७. उप सचिव ( का.१४११,१४२१,१४२२,१४२३, व १४२४ ), नियोजन विभाग, मंत्रालय मुंबई.
८. अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय , मुंबई.
९. कक्ष अधिकारी ( का.१४२४/१४२२), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई.
११. निवडनस्ती (का.१४२५)